**वन विभागातील वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यांची पदे वर्ग करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफएसटी-११/१८/प्र.क्र.४३६/फ-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :-** प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.७(१)/आस्था-१/प्र.क्र.२७/व.सा.ए./२०१७-१८/९७, दि.२४.०८.२०१८.

**प्रस्तावना:-**

सामाजिक वनीकरण विभाग, अकोला यांचेकडे ५० कोटी वृक्ष लागवड कार्यक्रमाअंतर्गत असलेले वृक्ष लागवडीचे उद्दीष्ट या बाबीचा विचार करुन ०२ वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यांची पदे विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग, अकोला यांचेकडे वर्ग करण्यास प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुसार ०२ वनपरिक्षेत्र अधिकाऱ्यांची पदे विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग, अकोला यांचेकडे वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वन विभागातील प्रचलित आकृतीबंधानुसार उप वनसंरक्षक, अकोला वन विभाग, अकोला यांचेकडील वनपरिक्षेत्र अधिकारी संवर्गातील ०२ पदे विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग, अकोला यांचेकडे वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | ज्या वन विभागातून पद वर्ग करण्यात येत आहे त्या वन विभागाचे नाव | पदनाम व पदसंख्या | ज्या वन विभागात पद वर्ग करण्यात येत आहे त्या वन विभागाचे नाव | पदनाम व पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | उपवनसंरक्षक, अकोला वन विभाग, अकोला | वनपरिक्षेत्र अधिकारी- १ पद (भरीव वनीकरण कार्यक्रम- मानोरा) | सामाजिक वनीकरण विभाग, अकोला | वनपरिक्षेत्र अधिकारी- १ पद |
| | | वनपरिक्षेत्र अधिकारी- १ पद (भरीव वनीकरण कार्यक्रम- पातूर) | सामाजिक वनीकरण विभाग, अकोला | वनपरिक्षेत्र अधिकारी- १ पद |

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदरहू पदे वर्ग करण्याबाबत आवश्यक ती पुढील कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८११२७१२१२१५३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Babasaheb S. Shinde

Digitally signed by Babasaheb S. Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, cn=Babasaheb S. Shinde
Date: 2018.11.27 12:15:53 +05'30'

**(बा. सि.शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य नागपूर
४. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
६. उपवनसंरक्षक, अकोला वन विभाग, अकोला
७. सामाजिक वनीकरण विभाग, अकोला
८. निवडनस्ती/फ-४